**मुख्य अभियंता (स्थापत्य) यांच्या पुन:स्थापनेनंतर पदस्थापनेबाबत**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांक : टीएफएस-१३१७/प्र.क्र. ६८/१/सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक : ०७ एप्रिल, २०१७**

संदर्भ : सा.बां.विभाग, शासन आदेश क्रमांक एस-९२/११११६/ प्र.क्र. २०/सेवा-६(ड), दि.२४.०३.१७

**शासन आदेश :-**

श्री. अनिलकुमार बळीराम गायकवाड, मुख्य अभियंता यांचे निलंबन प्रकरणी शासन निर्णय सा.प्र.वि.दिनांक१४.१०.२०११ व दि. ३१.०१.२०१५ मधील प्रमुख निकषांची पूर्तता होत असल्याने त्यांचे निलंबन संपुष्टात आणून त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात यावे आणि वरील शासन निर्णयातील तरतुदींनुसार त्यांच्या विरुध्दचा खटला / अपील / विभागीय चौकशी प्रकरणाचा निकाल लागेपर्यंत त्यांची पदस्थापना अकार्यकारी पदावर राहील अशी निलंबन आढावा समितीने शिफारस केली आहे. त्यास अनुसरुन संदर्भाधीन शासन आदेशान्वये श्री.ए.बी.गायकवाड, मुख्य अभियंता यांना त्यांच्याविरुद्धच्या न्यायालयीन प्रकरणातील निर्णयाच्या व विभागीय चौकशीच्या निर्णयाच्या अधीन राहून, शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात आले असून, श्री.ए.बी.गायकवाड, यांची पदस्थापना मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री. गायकवाड यांनी नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये, अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

३. श्री. गायकवाड यांनी नवीन नियुक्तीच्या पदाचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०७१७३६४०१८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mridula Sanjeev Deshpande

Digitally signed by Mridula Sanjeev Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mridula Sanjeev Deshpande
Date: 2017.04.07 17:37:03 +05'30'

**( मृ.सं.देशपांडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
२. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई
३. मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/नागपूर/विशेष प्रकल्प, मुंबई/ राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई/ प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, ग्रामविकास विभाग, मुंबई,
४. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
७. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
९. महालेखापाल-१ /२,( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, मुंबई /नागपूर,
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई / निवासी लेखाधिकारी, मुंबई,
११. श्री.ए.बी.गायकवाड, मुख्य अभियंता,
१२. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१४. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१६. प्रधान सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१७. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१८. सर्व सहसचिव / उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. कार्यासन आस्था-१, आस्था-३, सेवा-६, संगणक कक्ष, रोखशाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. निवडनस्ती.